**प्रशासकीय मान्यता**

सर ज.जी.समुह रुग्णालय, मुंबई या संस्थेतील रुग्णालय आवारातील सॉप्टवेअर बेस्ड वायरलेस ध्वनीक्षेपक सुरक्षा यंत्रणा वायर फ्री सेंट्रलाइज्ड व इंटीग्रेटेड, मॉनिटरींग स्टेशन बसविणेसाठी

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**

शासन निर्णय क्रमांक : जेएचएम-२०१८/प्र.क्र.२३२/प्रशा-१

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल इमारत,

९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.

दिनांक : १४ नोव्हेंबर, २०१८.

**वाचा :** संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे क्रमांक : संवैशिवसं /जजीरु/ ध्वनीक्षेपक सुरक्षा यंत्र/प्रमा/७४९६/प(आय)/७४९२/१८, दिनांक १२.०७.२०१८.

**शासन निर्णय :-** सर ज.जी.समुह रुग्णालय, मुंबई या संस्थेतील रुग्णालय आवारातील सॉप्टवेअर बेस्ड वायरलेस ध्वनीक्षेपक सुरक्षा यंत्रणा वायर फ्री सेंट्रलाइज्ड व इंटीग्रेटेड, मॉनिटरींग स्टेशन बसविणेच्या कामाच्या अंदाजपत्रकास खालील तक्त्यात दर्शविलेल्या प्रमाणे एकूण रुपये ३२,६१,८५८/- ( रुपये बत्तीस लक्ष एकसष्ठ हजार आठशे अठ्ठावण्ण फक्त) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | स्थापत्य दुरुस्ती बांधकामाचे नाव | प्रस्तावित केलेली अंदाजित रक्कम रुपये | सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दर्शविलेली रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | Providing Software based Wireless Address able Security System with wire Free Centralized & Integrated Monitoring Station at J.J. Hospital Mumbai | ३३,०९,१५७ | ३२,६१,८५८ |
| | **एकूण** | ३३,०९,१५७ | ३२,६१,८५८ |

अटी व शर्ती :-

१) काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची खात्री करावी.

२) कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामास सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अभियंता/अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.

३) कामासाठी जागेची उपलब्धता, जागा पुरेशी आहे किंवा नाही, याबाबतची खात्री संबंधीत संस्था प्रमुखांनी करावी.

४) संबंधीत संस्थेच्या अधिष्ठातांनी या विभागाचे शासन परिपत्रक दिनांक ७.२.२०१३ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांचे पालन करावे.

२. सदर कामासाठी निधीची तरतूद झाल्याशिवाय प्रत्यक्ष कामास सुरुवात करु नये. निधीची तरतूद झाल्यानंतर सदर काम हे खाली नमूद केलेल्या लेखाशीषाअंतर्गत मंजूर तरतूदीतून करण्यात येईल.

मागणी क्रमांक - एच-८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन,
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ मधील वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका-१९७८ भाग-१, उप विभाग-पाच अनुक्रमांक-५, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तीकेतील परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाने दिनांक २३.१०.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याच संकेतांक २०१८१११४१२३८२७५२१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun M. Dahale

Digitally signed by Arun M. Dahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, cn=Arun M. Dahale
Date: 2018.11.14 15:06:03 +05'30'

(अ.मु.डहाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) महालेखापाल-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र,मुंबई.
२) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
३) अधिष्ठाता, सर ज.जी.समूह रुग्णालय, भायखळा, मुंबई.
४) सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई (इमारत-३) मंत्रालय, मुंबई.
५) कार्यकारी अभियंता, एकात्मिक घटक (सार्वजनिक बांधकाम) विभाग, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८) निवडनस्ती (प्रशा-१).